(२५४)

201504231211066327

**चिखलपाडा खारभूमी योजना ता.पालघर, जि.ठाणे या योजनेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २००८/(१६९/२००८)/ खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १७/११/२००९.

पहावे :- १) चिखलपाडा / तां-५(१)/२०६४/जसंवि/कोकण प्रदेश/ मुंबई, दि.२८/०३/२००८
२) मु.अ.को.प्र.मुंबई यांचे पत्र क्रमांक मुअ/जसंवि/कोप्र/३८०६/खारभूमी/चिखलपाडा/ तां-१/६३३६/ दि.२२/१०/२००८

प्रस्तावना :-

चिखलपाडा खारभूमी योजना ता.पालघर, जि.ठाणे ही योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. या योजनेस किनारा नियमन क्षेत्र (CRZ) १९९१ मधून सुट मिळाली आहे. योजनेची लांबी २१५० मी. असून योजनेस एकूण १० उघाडया आहेत. या योजनेमुळे १२९ हेक्टर खाजगी क्षेत्र पुनःप्रापित होणर असून ही योजना नवीन आहे. सन २००७-०८ च्या दर सूचीवर आधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

चिखलपाडा खारभूमी योजना ता.पालघर, जि.ठाणे या योजनेस सन २००७-२००८ च्या दरसुचीवर आधारीत प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये १,०१,९०,२२८/- (रूपये एक कोटी, एक लक्ष, नव्वद हजार, दोनशे अठ्ठावीस फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये ९२,६३,८४४/- व रूपये ९,२६,३८४/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे योजनांतर्गत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण १०९९/१२९/९९/मोप्र(प्र)

H:\patil\suprama gr.doc

दि.१८/०५/१९९९ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (६९/२००९) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( ज.प्र.जहागिरदार)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, ठाणे
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

H:\patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २००८/(१६९/२००८) खारभूमी दिनांक १७/११/२००९ चे सहपत्र
चिखलपाडा खारभूमी योजना ता.पालघर, जि.ठाणे अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | बाब | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | ०.०० |
| २ | "ब" (भूसपादने) | ०.०० |
| ३ | "सी" मुख्य कामे | ५५६५००६ |
| ४ | "आर.एच.टी" वर्क्स | ३०२७५३१ |
| ५ | "के" इमारती | १७१८५१ |
| ६ | "एम" वृक्षारोपन | १५७१६७ |
| ७ | "ओ" संकिर्ण | २७८२५ |
| ८ | "पी" देखभाल | २१४८१ |
| ९ | "आर" दळणवळण | २९२९८३ |
|  | कामाप्रित्यर्थ किंमत | ९२६३८४४ |
|  | अनुषंगिक खर्च (भूसंपादन किंमत वगळून १० टक्के) | ९२६३८४ |
|  | एकूण | १०१९०२२८ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | १२९ हेक्टर |
| लाभव्यय गुणोत्तर | ४.८५ |
| प्रती हेक्टरी पुनःप्रापणाचा खर्च | रू.७८९९४ < ९५०००/- |